रिट याचिका क्र. ६९६०/२०२३ श्रीम.शालनबाई शिंगे विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांच्या दि. १९.०७.२०२३ रोजीच्या न्याय निर्णयानुसार कार्यवाही करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-१०२३/प्र.क.१३१/२०२३/स्वासैक-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०१ एप्रिल, २०२४

वाचा :-
१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.निवृवे १०१६/प्र.क्र.७८/स्वासैक-१, दि.०२.०६.२०१६.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. न्यायाप्र १२१४/प्र.क्र.४७/२०१४/स्वासैक-१, दि.३०.०७.२०१६.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.-पीओएस १२१७/प्र.क्र.१०१(भाग-२)/स्वासैक-३, दि.३१.०७.२०२१
४. रिट याचिका क्र. ६८४३/२०२३, ६९६०/२०२३, ६९८८/२०२३ व ६९९०/२०२३ श्री. तुकाराम कांबळे व इतर विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांच्या दि. १९.०७.२०२३ रोजीचा न्यायनिर्णय
५. निवासी उपजिल्हाधिकारी, धाराशिव यांचे क्र.२०२३/उपचिटणीस/एमएजी-२/कावी-५६३ दिनांक १०.०१.२०२४ चे पत्र

**प्रस्तावना-**

१. हैद्राबाद मुक्ती संग्रामात सहभाग घेतल्याप्रकरणी श्री.रामकृष्ण शिंगे यांच्या गुलबर्गा कारागृहाच्या तुरुंगवास प्रमाणपत्राच्या सत्यतेबाबत राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.३१.०३.२०१७ रोजीच्या अंतिम अहवाल सादर केला आहे. गुन्हे अन्वेषण विभागाने प्रत्येक अर्जदाराबाबत केलेली चौकशी व त्यांचे निष्कर्षासहीत व मंजूरी/नामंजुरी अभिप्रायासह स्वतंत्र प्रस्ताव सादर करण्याबाबत विभागीय आयुक्त, संभाजीनगर यांना कळविण्यात आले. त्यानुषंगाने विभागीय आयुक्त, संभाजीनगर यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १३.०१.२०२० रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तांनुसार कै.श्री.रामकृष्ण शिंगे यांनास्वातंत्र्य सैनिक उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.न्यायाप्र - १२१६/प्र.क्र.६२/२०१६/ स्वासैक-३, दि.३१.०७.२०२१ अन्वये मंजूरीच्या आदेशाच्या दिनांकापासून स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन मंजूर केले आले.

२. सदर आदेशाविरुध्द कै.श्री.रामकृष्ण शिंगे यांच्या पत्नी श्रीम.शालनबाई शिंगे यांनी मा. मुंबई उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे रीट याचिका क्रमांक ६९६०/२०२३ दाखल

केली. त्यांनी अर्जाच्या दिनांक पासून स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन मंजूर करण्याची मागणी केली होती.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथील रीट याचिका क्रमांक ६८४३/२०२३ श्री.तुकाराम कांबळे विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर, रीट याचिका क्रमांक ६९६०/२०२३ श्रीम.शालनबाई शिंगे विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर, रीट याचिका क्रमांक ६९८८/२०२३ श्री.सिद्राम ब्याळे विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर रीट याचिका क्रमांक ६९९०/२०२३ श्री.मल्लिकार्जुन सुतार विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर प्रकरणी दि.१९.०७.२०२३ रोजीच्या न्यायनिर्णयान्वये याचिकाकर्ते श्रीम.शालनबाई शिंगे यांना राज्य शासन स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन थकबाकी देणेबाबत खालीलप्रमाणे आदेशित केले आहे.

A co-ordinate Bench of this Court has delivered a judgment on 23.03.2023 in WP No.11864/2019 filed by Laxmibai Bhaurao Mane Vs. The State of Maharashtra and others. The issue before us was also the issue before the Co-ordinate Bench and by the said judgment, the writ petition was partly allowed with the following directions:-

"II. We hold and declare that the Government Resolution dated 30th July, 2016 is invalid so far it is made applicable to cases where unimpeachable evidence regarding participation of the freedom fighters is available on record and it is not required to establish claim on the basis of allied material.
III. The respondents are directed to release the Freedom Fighters Pension to the petitioner w.e.f. 16th July, 2011 and release all consequential benefits within a period of 3 months from the date of this order."

In view of the above, the Writ Petitions filed by Tukaram (WP No. 6843/2023) and Malikarjun (WP No. 6990/2023), are partly allowed in terms of the two directions set out in the judgment in Laxmibai, which are reproduced hereinabove. With regard to the Writ Petitions by Shalanbai (WP No. 6960/2023) and Sidram (WP No. 6988/2023), the Authorities would verify the dates, from their records, on which the documents were tendered and from those dates, these Petitioners would be entitled for the pensionary benefits. These two petitions are accordingly disposed of. Let this verification exercise be completed within 90 days and upon being convinced, the pension would be released with arrears.

४. सदर आदेशाच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, धाराशिव यांनी याचिकाकर्ते श्रीम.शालनबाई शिंगे यांना देय होणाऱ्या दिनांक २१.१०.२०१३ ते दिनांक १०.०१.२०२४ या कालावधीच्या थकबाकीची परिगणना करुन प्रस्ताव शासनास सदर केला आहे. तथापि, कै.श्री.रामकृष्ण शिंगे यांच्या नस्तीवरील कागदपत्रे तपासली असता त्यांनी निवृत्तीवेतन मिळण्याबाबतचा द्वितीय अर्ज दिनांक २९.१०.२०१९ रोजी सादर केला आहे. सदर बाब विचारात घेता त्यांना थकबाकी दिनांक २१.१०.२०१३ ऐवजी दिनांक २९.१०.२०१३ पासुन अनुज्ञेय आहे. उपरोक्त न्यायनिर्णयाच्या अंमलबजावणीकरीता शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

## शासन निर्णय:-

१. मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथील रिट याचिका क्र.६९६०/२०२३, श्री.रामकृष्ण शिंगे विरुध्द महाराष्ट्र शासन व इतर या प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या दि.१९.०७.२०२३ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयास अनुसरुन श्री. रामकृष्ण शिंगे यांना त्यांनी जेल

प्रमाणपत्र सादर केल्याच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक २९.१०.२०१३ पासून राज्य शासनाचे स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतन अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. त्यानुसार कै.श्री.रामकृष्ण शिंगे यांना राज्य शासनाच्या स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाची थकबाकीची रक्कम पुढीलप्रमाणे देय आहे.

| अ.क्र. | दिनांक | कालावधी | प्रति माह (रु.) | एकूण रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २९.१०.२०१३ ते ०१.१०.२०१४ | ११ महिने ०४ दिवस | ८,०००/- (शासन निर्णय सा.प्र.वि.क्र.पीओएस-२०१०/प्र.क्र.२९/स्वासैक-१, दि.०७.१२.२०१० नुसार) | ८,००० X ११ = ८८,०००/-<br>(८०००/३१) X ०४ = १०३२/-<br>एकूण- ८९,०३२/- |
| २ | ०२.१०.२०१४ ते ३१.१२.२०१४ | ०२ महिने ३० दिवस | १०,०००/-(शासन निर्णय सा.प्र. वि. क्र. निवृवे-२०१२/ प्र.क्र.११९/२०१२ स्वासैक-१, दि.०३.०९.२०१४ नुसार) | १०,००० X २ = २०,०००/-<br>(१०,०००/३१) X ३० = ९,६७७/-<br>एकूण- २९,६७७/- |
| ३ | ०१.०१.२०१५ ते ३१.१२.२०२० | ७२ महिने | १०,०००/- | १०,००० X ७२ = ७,२०,०००/- |
| ४ | ०१.०१.२०२१ ते १२.०७.२०२१ | ६ महिने १२ दिवस | १०,०००/- | १०,००० X ६ = ६०,०००/-<br>(१०,०००/३१) X १२ = ६३,८७१/- |
| **एकुण** | | | | **९,०२,५८०/-** |

३. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार श्रीम.शालनबाई शिंगे यांना उपरोक्त विवरणात दर्शविल्याप्रमाणे रु.९,०२,५८० (अक्षरी रुपये नऊ लाख दोन हजार पाचशे ऐंशी फक्त ) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. या प्रित्यर्थचा मागणी क्र. ए-५, प्रधान लेखाशिर्ष - २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतन (००) (०१) स्वातंत्र्य सैनिक व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती इत्यादींना निवृत्ती वेतन दत्तमत (२२३५ ००१५) या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याचिकाकर्त्यांना अदा करावयाचा थकबाकीचा तपशील सोबत जोडलेल्या जोडपत्रात नमुद करण्यात आला आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक२०२४०४०११४५४५७८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KISHOR BALIRAM NANVARE

Digitally signed by KISHOR BALIRAM NANVARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=fe999a6df0afb3cbcb04011b094c0c03933b517a839feb4c64184c7f85f5adb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C5D8A2C16BC0D3779E84FEFC316A16497391C87251547B9A0338E4A70D535BD, cn=KISHOR BALIRAM NANVARE
Date: 2024.04.01 15:04:18 +05'30'

**(किशोर ब. ननवरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री,यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
२) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १ व २ मुंबई /नागपूर (२ प्रती)
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
४) अपर मुख्य सचिव व विचौअ-१ यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) जिल्हाधिकारी, धाराशिव (५ प्रती) (By R.P.A.D.) (यांना विनंती करण्यात येते की, केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल एका महिन्यांत शासनास तसेच मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद यांना सादर करावा.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव.
७) विभागीय आयुक्त कार्यालय,औरंगाबाद.
८) सरकारी वकील,मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद.
९) श्रीम.शालनबाई रामकृष्ण शिंगे, मु.पो.तुगांव, ता.उमरगा, जि.धाराशिव.
१०) कक्ष अधिकारी (स्वासैक -१/३)
११) निवडनस्ती (स्वासैक-२).